**प्रशासकीय मान्यता-**
**नायगाव बाजार,जिल्हा नांदेड येथील न्यायिक अधिका-यांसाठी निवासस्थान बांधणे.**

**महाराष्ट्र शासन**
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र.सीआरक्यू-२४०९/८६६/प्र.क्र.१६५/का.१३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दि. ११ मार्च,२०१०

पहा :- -१) प्रबंधक(निरीक्षणे-२) उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई यांचे पत्र क्र.बी(डब्ल्यु)६०७६/१९९१, दि.१०.११.२००९.
२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, नांदेड यांचे पत्र क्र.बांध/४९७१/२००९, दि.२.९.२००९.

शासन निर्णयः-नायगाव बाजार,जिल्हा नांदेड येथील दिवाणी न्यायाधीश (क.स्त.) यांचेकरिता बांधावयाच्या निवासस्थानाच्या रु.२१,५५,३३०/- ( रु.एकवीस लक्ष पंचावन्न हजार तीनशे तीस फक्त) इतक्या अंदाजित खर्चास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

( रुपये )

| अ.क्र | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | इमारत बांधकाम | ८,९६,५०० |
| २ | ४% आकस्मिकता खर्च | ३५,८६० |
| ३ | ८% पाणीपुरवठा | ७१,७२० |
| ४ | ११% विद्युतीकरण | ९८,६१५ |
| ५ | अंतर्गत रस्ते/सरफेस ड्रेन | २,००,००० |
| ६ | फर्निचर | ३,००,००० |
| ७ | रेन वॉटर हार्वेस्टींग | १,००,००० |
| ८ | कंपाऊंड वॉल | २,००,००० |
| ९ | अंतर्गत स्ट्रीट लाईट | १,००,००० |
| १० | प्लींथ प्रोटेक्शन | ५०,००० |
| ११ | ५% भाववाढीकरिता | १,०२,६३५ |
| | एकूण | २१,५५,३३० |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

(अ) काम सुरु करण्यापूर्वी जमिनीच्या मालकी हक्काबाबत खातरजमा करण्यात यावी.
(ब) प्रस्तुत इमारतीचे काम वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मांडणी नकाशा व विस्तृत नकाशा तयार करुन घेतल्यावरच सुरु करावे.
(क)अंतर्गत डांबरी रस्ते इत्यादि बांधकामाच्या छेद नकाशासह मापे विस्तृत अंदाजपत्रकात समाविष्ट करूनच काम सुरू करण्यात यावे.

३.	या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-७, ४२१६-गृहनिर्माणावरील भांडवली खर्च-०१ शासकीय निवासी इमारती-७०० इतर गृहनिर्माण (एक) न्यायदान -पंचवार्षिक योजनांतर्गत योजना " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४.	हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-३४/इमा-२, दि.१५.२.२०१० अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि शासन निर्णय, वित्त विभाग क्र. :-विअप्र १००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५ मे, २००९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

( र. ग. पांचाळ )
कार्यासन अधिकारी.

प्रति,

महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक (निरीक्षणे-२), उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश,नांदेड.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,नांदेड.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,नांदेड
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
जिल्हा कोषागार अधिकारी,नांदेड
उप कोषागार अधिकारी,नांदेड
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
वित्त विभाग/व्यय-६,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
कक्ष अधिकारी, का. ११ व १२,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती.